**शासकीय निरीक्षणगृह (रिमांडहोम) बीड या इमारतीच्या विद्युत फिटींगच्या कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बालगृ-२०२३/प्र.क्र.६७/का-८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक- १७ मार्च, २०२३.

वाचा :-

आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/बांधकाम/२०२२-२३/८३१ दिनांक- १४/०२/२०२३

**शासन निर्णय :-**

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ व सुधारित २०२१ अन्वये कार्यरत शासकीय निरीक्षणगृह (रिमांडहोम) बीड या इमारतीच्या आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी वाचा येथील पत्रान्वये सादर केलेल्या विद्युत फिटींगच्या विद्युत व्यवस्था करण्यासाठीचे सन २०२१-२२ च्या राज्य दरसूचीनुसार तयार करण्यात आलेल्या ₹१७,६४,६०८/- (रुपये सतरा लक्ष चौसष्ठ हजार सहाशे आठ मात्र) इतक्या रक्कमेच्या खालील अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | Providing Renovation to Electrification installation in Govt Observation Home (Remand Home) office G+1 floor Bld No 2 at Chandmari Colony Dhanora Road Beed | ₹ १७,६४,६०८/- |
| **एकूण** | | **₹ १७,६४,६०८/-** |

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय भाग-२, दि.२०/९/२०१९ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-५, अनुक्रमांक ३ व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर बाबीवर होणारा खर्च मागणी क्र. एक्स-३, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२- समाज कल्याण, ८००- इतर खर्च, (०१) (०५) इमारतीची दुरुस्ती (२२३५-२२४१) या लेखाशिर्षांतर्गत २७- लहान बांधकामे या उद्दिष्टाकरिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३१६१८०२०५०३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NILESH JANARDAN PATIL

Digitally signed by NILESH JANARDAN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D8429F943427129A6A081EE223FEAC961CDD926C4D3542C55A470F22A7C7AE, cn=NILESH JANARDAN PATIL
Date: 2023.03.21 12:49:31 +05'30'

**(डॉ.निलेश ज. पाटील)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई,
७. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
१०. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
११. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
१२. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
१४. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई,
१५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, बीड,
१६. निवड नस्ती, का-०८.